Index of Safety Perception तयार करण्यासाठी पथदर्शी स्वरुपात पोलीस आयुक्तालय, नवी मुंबई आणि जिल्हा पोलीस अधीक्षक कार्यालय, सातारा या दोन पोलीस घटकांची निवड करण्यास व त्यांच्या सर्वेक्षणाकरीता होणा-या खर्चास प्रशासकीय मंजूरी देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: विपआ-०३१८/प्र.क्र.२४७/पोल-१३**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २२ जून, २०२३

**संदर्भ** :- पोलीस महासंचालक कार्यालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे क्रमांक पोमसं/२३/५२५२/नियम २५९ अन्वये प्रस्ताव/८३/२०१७, दिनांक २४/११/२०२२ चे पत्र

**प्रस्तावना:-**

पोलीस दलाकडील दैनंदिन कामे जसे, गुन्हयांना अटकाव करणे, गुन्हे शोध, प्रतिबंधक कारवाई, उत्सव/सण बंदोबस्त, राजकिय बंदोबस्त तसेच मोर्चा, आंदोलने याबाबत बजावलेली भुमिका इत्यादी प्रकारच्या पोलीसांच्या वेगवेगळया कामगिरीतून पोलीस दलाची ओळख व पोलीस दलाबाबतचे जनतम तयार होत असते. ही ओळख/जनमत पोलीसांचा जनतेशी येणारा प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष संबंधातून तयार होत असते. त्यामुळे पोलीस दलाची जनतेमध्ये चांगली प्रतिमा निर्माण होण्यासाठी तसेच ती सुधारण्यासाठी दैनदिन कामकाजात पोलीसांनी जनतेसोबत सुसंवाद साधून पोलीस दलाबाबत चांगली प्रतिमा निर्माण करणं आवश्यक असल्याने पोलीस दलाच्या कामगिरीतून राज्यातील जनतेला किती सुरक्षित वाटते, याबाबत राज्यातील पोलीस घटकांकरीता पथदर्शी स्वरूपात (Pilot Basis) इंडेक्स ऑफ सेफ्टी परसेप्शन (Index Of Safety Perception) तयार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने, पोलीस महासंचालक कार्यालयाकडून प्राप्त झालेल्या संदर्भाधीन प्रस्तावानुसार खालील प्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे :

**शासन निर्णय** :-

१. पोलीस दलाच्या कामगिरीतून राज्यातील जनतेला किती सुरक्षित वाटते, याचे मुल्यमापन करून जनतेमध्ये पोलीसांची चांगली प्रतिमा निर्माण होण्यासाठी करावयाच्या कार्यवाहीचा आराखडा तयार करण्याच्या दृष्टीने राज्यातील पोलीस घटकांकरीता पथदर्शीस्वरूपात (Pilot Basis) इंडेक्स ऑफ सेफ्टी परसेप्शन (Index Of Safety Perception) तयार करण्याकरीता मान्यता देण्यात येत आहे.

२. पथदर्शी स्वरूपात (Pilot Basis) इंडेक्स ऑफ सेफ्टी परसेप्शन (Index Of Safety Perception) तयार करण्याकरीता राज्यातील पोलीस आयुक्तालय, नवी मुंबई व पोलीस अधीक्षक

कार्यालय, सातारा या दोन पोलीस घटकांची निवड करण्यास व याकरिता येणा-या अंदाजित रु. १८.०० लक्ष एवढ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**३.** Index Of Safety Perception तयार करण्याच्या अनुषंगाने पोलीस आयुक्त, नवी मुंबई व पोलीस अधीक्षक, सातारा या दोन पोलीस घटकातील सर्वेक्षण करण्याकरिता संस्थेची निवड, संस्थेची कार्यपद्धती व कार्यकक्षा, सर्वेक्षण पद्धत, प्रश्नावली/ सँपल पद्धत निवड इ. बाबत पोलीस महासंचालक कार्यालय, महाराष्ट्र राज्य यांनी आवश्यक कार्यवाही करावी.

**४.** महाराष्ट्र वित्तीय नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-तीन, अ.क्र. ४, परिच्छेद क्रमांक २७(२) येथे नमूद वित्तीय शक्तीनुसार, योजनेला किंवा प्रस्तावाला (वित्तीय मंजूरी धरून) मान्यता देण्याचे अधिकार प्रशासनिक विभागास आहेत. सदर बाब विचारात घेता सदर सर्वेक्षणासाठी येणारा अपेक्षित एकूण रु.१८,००,०००/- (अक्षरी रु अठरा लक्ष फक्त) इतका खर्च "२०५५-पोलीस-१०९-जिल्हा पोलीस दल(००) (०१) जिल्हा पोलीस बल (२०५५०१६८) (दत्तमत) (अनिवार्य)-५० इतर खर्च" या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२२१६१३०३०१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by RAVINDRA D AUTE
Date: 2023.06.22 16:15:06 +05'30'

**( रविंद्र औटे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
६) पोलीस आयुक्त, नवी मुंबई
७) पोलीस अधीक्षक, सातारा
८) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई.
९) निवड नस्ती, पोल-१३.